उपअभियंता (गट-अ), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदी नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

### पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

### शासन आदेश क्रमांकः आपना २०१३/प्र.क्र. २४९/पापु-१५

७ वा मजला, गो.ते. रूग्णालय इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०००01
तारीख: ३१ जुलै, २०१४

**वाचा :-**

**१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १७७९ (४)/१३/पंधरा, दिनांक १३ नोव्हेंबर,२०१३**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उपअभियंता (गट-अ) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी केलेल्या शिफारशीनुसार खालील उमेदवारांच्या भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमध्ये वेतन बँड रु.१५६००-३९१००, ग्रेडवेतन रु. ५४००/-अधिक त्यावर नियमानुसार मिळणारे महागाई व इतर भत्ते या वेतनश्रेणीत ते ज्या दिनांकापासून पदभार स्विकारतील, त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून नेमणूका करण्यात येत आहेत.

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|
| १ | श्री.कोंडे विवेक मुकुंदराव | इ.मा.व. | अराखीव असलेल्या पदाकरिता |
| २ | श्री. काळे रणजित नामदेव | भ.ज.(क) | भ.ज.(क) करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| ३ | श्री.भुसे संदिप विश्वास | भ.ज.(क) | अराखीव असलेल्या पदाकरिता |
| ४ | श्री.पाटील नितीन दामोधर | इ.मा.व. | इ.मा.व. करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| ५ | श्री.दंडगव्हाळ नितीन मुरलीधर | इ.मा.व. | इ.मा.व. करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| ६ | श्री.नदाफ खलीद अहमद मुस्तफा | इ.मा.व. | अराखीव असलेल्या पदाकरिता |
| ७ | श्री.गडकर संदिप वसंत | अ.जा. | अ.जा. करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| ८ | श्री.ढेरे गणेश सूर्यकांत | अराखीव | अराखीव असलेल्या पदाकरिता |

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|
| ९ | श्री.पाटील प्रविण रुपचंद | अराखीव | अराखीव असलेल्या पदाकरिता |
| १० | श्री.पाटील मोहन वासुदेव | इ.मा.व. | अराखीव असलेल्या पदाकरिता |
| ११ | श्री.मानकर निलेश शेषराव | इ.मा.व. | इ.मा.व. (महिला) करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| १२ | श्री.सर्जे हिराकांत बंकट | अ.ज. | अ.ज. करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| १३ | श्री.पैठणे संदिप भानुदास | अ.जा. | अ.जा. (महिला) करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| १४ | श्रीमती खरात करुणा विश्वनाथ | अ.जा. | अराखीव (महिला) करिता राखीव असलेल्या पदाकरिता |
| १५ | श्रीमती पाटील धनश्री दिलीपराव | अराखीव | अराखीव (महिला) करिता राखीव असलेल्या पदाकरिता |

१) सदर उमेदवारांनी आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या (३० दिवस) आत पदभार स्विकारावा.

२) सदर उमेदवार विहीत मुदतीत कामावर रुजू न झाल्यास संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनाकडे उचित कार्यवाहीसाठी अहवाल पाठवावा.

३) सदर उमेदवारांनी पदग्रहण प्रतिवेदन संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्यामार्फत सादर करावे.

४) सदर उमेदवारांना परिविक्षा कालावधी मध्ये पहिल्या वर्षानंतर वेतनवाढ देण्यात यावी आणि त्यापुढील वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यावर देण्यात यावी.

५) सदर उमेदवारांना विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण व्हावी लागेल. तसेच, ते अगोदरच विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाले नसतील किंवा त्यांना त्या परिक्षेतून सूट मिळाली नसेल तर विहीत नियमानुसार विभागीय परीक्षा, मराठी व हिंदी भाषा परीक्षा ही उत्तीर्ण व्हावी लागेल.

६) सदर उमेदवारांनी कामाचा अपेक्षित दर्जा न राखल्यास आणि विहित विभागीय परीक्षा परिविक्षा कालावधी मध्ये उत्तीर्ण न केल्यास आणि अशा तऱ्हेने त्यांचे काम किंवा वर्तणूक अयोग्य किंवा अननुरुप आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

७) सदर उमेदवारांना राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी शासनाला कमीत कमी एक महिन्याची पूर्वसूचना दिली पाहिजे. त्यांना सेवेतून कमी करावयाचे झाल्यास शासनही एक महिन्याची पूर्वसूचना देईल. तथापी, त्यांच्या सेवेच्या काळामध्ये गैरवर्तन व सेवेच्या शर्तीचा भंग झाला तर अशी पूर्वसूचना न देता त्यांना कामावरून कमी करण्यात येईल. पूर्वसूचनेचा एक महिन्याचा कालावधी शासन वेळोवेळी जे बदल करील त्या बदलांना अधीन राहून ठरविण्यात येईल.

८) सदर उमेदवारांचा परिविक्षा कालावधी संपल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनपरिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एम. आर. व्ही. १०६२/डी, दिनांक २६/४/१९६२ मध्ये विहीत केलेल्या नमून्यात त्यांच्या कामाबाबतचा खास अहवाल (दोन प्रतीत) शासनाकडे पाठवावा.

९) श्री.पाटील नितिन दामोधर, श्री.दंडगव्हाळ नितीन मुरलीधर, श्री.नदाफ खलीद अहमद मुस्तफा, श्री.ढेरे गणेश सुर्यकांत व श्री.पाटील मोहन वासुदेव या उमेदवारांनी संगणक ज्ञान अर्हतेबाबतचे प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यामुळे, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९ मार्च, २००३ मधील अटीच्या अधीन राहून त्यांना नियुक्ती देण्यात येत आहे. त्यांची नियुक्ती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची आहे. त्यांनी नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत संगणक अर्हता प्राप्त करणे आवश्यक राहील, अन्यथा त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीसीसी-२०११/प्रक्र १०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ नुसार श्री. सर्जे हिराकांत बंकट या उमेदवाराची त्याच्या जात पडताळणी प्रमाणपत्राशिवाय (जात वैधता प्रमाणपत्र) सदर पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर सदर उमेदवारांनी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासुन सहा महिन्याच्या आत आपल्या जात प्रमाणपत्राची वैधता संबंधित जातपडताळणी समितीकडुन करुन घेणे आवश्यक राहील. श्री.सर्जे हिराकांत बंकट यांनी जात वैधता प्रमाणपत्र सहा महिन्याच्या आत शासनास सादर केले नाही अथवा जातपडताळणी समितीने त्याचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविले तर त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

११) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दिनांक १३ नोव्हेंबर,२०१३ च्या पत्रामध्ये शिफारसपात्र उमेदवारांचे गोपनीय अभिलेख तपासून नंतरच त्यांना नियुक्ती देण्याबाबतचा निर्णय घेण्याबाबत सूचना केली आहे.त्यानुसार जे उमेदवार शासकीय/निमशासकीय सेवेत आहेत. अशांपैकी श्री.गडकर संदिप वसंत, श्री.पाटील प्रविण रुपचंद, श्रीमती खरात करुणा विश्वनाथ व श्रीमती पाटील धनश्री दिलीपराव यांचे गोपनीय अहवाल शासनास प्राप्त न झाल्याने ते तपासता आले नाहीत.सदर उमेदवारांना त्यांच्या गोपनीय अहवालाच्या प्रतवारीच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात येत आहे.

१२) सदर नियुक्ती आदेश गट-अ व गट-ब पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप याबाबत सा.प्र.वि.ने दिनांक २१.०६.२०१० रोजी निर्गमित केलेल्या परिपत्रकानुसार तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

२. संचालनालय,भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेअंतर्गत शाखा अभियंत्यांना नामनिर्देशनाच्या कोट्यातील उपअभियंता (यां.) पदांवर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत तदर्थ स्वरुपात नियुक्त्या देण्यात आल्या आहेत. सदर तदर्थ पदोन्नत्या रद्द करुन त्यांच्या जागेवर तसेच उपअभियंता (यां.) या पदाच्या निव्वळ रिक्त असलेल्या पदांवर खालीलप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांच्या नियुक्त्या/पदस्थापना करण्यात येत आहे.

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | नामनिर्देशनाने नियुक्तीनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|
| १ | श्री.कोंडे विवेक मुकुंदराव | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, वाशिम |
| २ | श्री. काळे रणजित नामदेव | संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे |
| ३ | श्री.भुसे संदिप विश्वास | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, पुणे येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.ए.के.पाटील यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| ४ | श्री.पाटील नितीन दामोधर | उपअभियंता(यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, भंडारा |
| ५ | श्री.दंडगव्हाळ नितीन मुरलीधर | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.एम.आर.लाड यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| ६ | श्री.नदाफ खलीद अहमद मुस्तफा | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, चंद्रपूर येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.एम. व्ही.व्हटकर यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | नामनिर्देशनाने नियुक्तीनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|
| ७ | श्री.गडकर संदिप वसंत | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.ए.एस.कासार यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| ८ | श्री.ढेरे गणेश सूर्यकांत | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, सोलापूर येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.एस.एन.सुर्यवंशी यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| ९ | श्री.पाटील प्रविण रुपचंद | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग |
| १० | श्री.पाटील मोहन वासूदेव | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, ठाणे येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.एन.एल.लोणकर यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| ११ | श्री.मानकर निलेश शेषराव | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, हिंगोली |
| १२ | श्री.सर्जे हिराकांत बंकट | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, उस्मानाबाद येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.एन.सी.पुजारी यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या |

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | नामनिर्देशनाने नियुक्तीनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|
| | | पदावर |
| १३ | श्री.पैठणे संदिप भानुदास | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, बीड येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.बी.डी.पाटील यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| १४ | श्रीमती खरात करुणा विश्वनाथ | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, लातूर येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.के.जी.पवार यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |
| १५ | श्रीमती पाटील धनश्री दिलीपराव | उपअभियंता (यां.), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, सातारा येथे तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले श्री.जे.बी.लाडे यांना उपअभियंता या पदावरुन शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन त्यांच्या रिक्त होणाऱ्या पदावर |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१५४३१७६२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.07.31 12:02:08 +05'30'

(प्रमोद गि. कानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे

२) महालेखाकार महाराष्ट्र-१ /२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षण /लेखा व अनुज्ञेयता)

३) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई (पत्राने)

४) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, (सर्व)

५) संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम, पुणे, भंडारा , अहमदनगर, चंद्रपूर, कोल्हापूर, सोलापूर, सिंधुदुर्ग, ठाणे, हिंगोली, उस्मानाबाद, बीड, लातूर,सातारा

७) संबंधित उमेदवार (संचालकांमार्फत)

८) सामान्य प्रशासन विभाग (१२/१६) मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

९) निवडनस्ती पापु १५